**शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या महाविद्यालयातील संगणक अभियांत्रिकी या पदवी अभ्यासक्रमाच्या प्रवेशक्षमतेत वाढ करण्यास अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने शासन मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. टीईएम-२०१८/प्र.क्र.२१३ /तांशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २५ जून, २०१८

**संदर्भ :** संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक २/एनजीसी/मान्यता/२०१८/६३१, दिनांक १९.०५.२०१८ व सहपत्रे.

**प्रस्तावना :-**

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी शैक्षणिक वर्ष २०१८-१९ करीता व्यावसायिक अभ्यासक्रमांना मान्यता देण्याबाबतची यादी दिनांक ०७.०५.२०१८ व दिनांक १४.०५.२०१८रोजीच्या ई-मेल द्वारे संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना उपलब्ध करुन दिली आहे. उपलब्ध करून दिलेल्या सदर यादीनुसार संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी त्यांच्या दिनांक १९/०५/२०१८ च्या पत्रान्वये शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून (शासकीय) अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या महाविद्यालयातील संगणक अभियांत्रिकी या पदवी अभ्यासक्रमाची प्रवेशक्षमता ६० वरुन १२० करण्यास शासन मान्यता देण्यासाठी प्रस्ताव सादर केला आहे. अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन, संचालक, तंत्र शिक्षण यांनी उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये प्रस्तावित केल्याप्रमाणे शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या महाविद्यालयातील संगणक अभियांत्रिकी या पदवी अभ्यासक्रमाची प्रवेशक्षमता ६० वरुन १२० करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन संचालक, तंत्र शिक्षण यांनी उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये प्रस्तावित केल्याप्रमाणे शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून (शासकीय) अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या महाविद्यालयातील संगणक अभियांत्रिकी या पदवी अभ्यासक्रमाची प्रवेशक्षमता ६० वरुन १२० करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१. प्रस्तुत बाबतीत अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या तसेच दिनांक २१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संस्थेस बंधनकारक राहील.

२. शासनाने विहित केलेल्या तसेच अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती संस्थेस लागू राहतील. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्र शिक्षण ,महाराष्ट्र राज्य यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

३. सदर पदवी अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या प्रवेश नियमानुसार/ पद्धतीनुसार करण्यात येतील.

४. सदर अभ्यासक्रमाच्या संलग्नीकरणासाठी संबंधित संस्थेने महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम २०१६ मधील तरतूदीनुसार संबंधित विद्यापीठाची मान्यता/ संलग्नीकरण घेणे आवश्यक राहील.

५. शासनाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संस्थेच्या संचालकांनी आकारल्यास संचालकांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

६. संस्थेतील माहिती तंत्रज्ञान या अभ्यासक्रमाची सर्व शासननिर्मित अध्यापकीय पदे संगणक अभियांत्रिकी या अभ्यासक्रमांसाठीच्या पदांशी संस्थेच्या नियामक मंडळाने संलग्न केली असल्याने संगणक अभियांत्रिकी या अभ्यासक्रमांच्या वाढीव प्रवेश क्षमतेच्या अनुषंगाने नवीन अध्यापकीय पदे निर्माण करण्याची आवश्यकता नाही.

७. संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा.प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

८. रॅगिंग संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.

९. याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संब्ंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०६२५१८०५२९८६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay A. Dharurkar

Digitally signed by Sanjay A. Dharurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, cn=Sanjay A. Dharurkar
Date: 2018.06.26 15:37:34 +05'30'

**( संजय धारुरकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, पुणे.
३. कुलसचिव, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, गणेशखिंड, पुणे-४११ ००७
४. संचालक, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, शिवाजीनगर, पुणे-४११ ००५
५. अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली - ११० ००१.
६. सहायक शिक्षण सल्लागार ( तांत्रिक ), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण भाग), नवी दिल्ली.
७. विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डींग, २ रा मजला, चर्चगेट, मुंबई
८. निवड नस्ती/तांशि-४.